साकताक न.202112201709518301

**शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना**

**महाराष्ट्र शासन**
कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक. पीएआयएस १२०५/ प्र.क्र.३१०/११अे
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ७ जुलै, २००६

वाचा :- १) शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, एनएआयएस १२०४/ प्र.क्र.१६६/११अे, दिनांक - १९ ऑगस्ट, २००४

२) शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, एनएआयएस १२०४/ प्र.क्र.१६६/११अे, दिनांक - ५ जानेवारी, २००५

३) शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, एनएआयएस १२०४/ प्र.क्र.१६६/११अे, दिनांक - ३१ मार्च, २००५

४)शासन पत्र क्रमांक पीआयएस-१२०५/प्र.क्र.३१०/११-अे, दिनांक २० एप्रिल,२००६

५)कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेव्यअवियो-सी-८/१९६/२००६, दिनांक २७ एप्रिल,२००६

६)कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेव्यअवियो-सी-८/१९६/२००६, दिनांक २७ एप्रिल,२००६

६)कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.शेअवियो-सी-८/२७५/२००६, दिनांक १५ जून,२००६

**प्रस्तावना :-**

शेती व्यवसाय करतांना होणारे रस्त्यावरील अपघात तसेच वीज पडणे, विजेचा शॉक बसणे, पूर सर्पदंश , विंचूदंश, व वाहन अपघात तसेच कोणत्याही नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अथवा अन्य कोणतेही अपघात यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढावतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या सदर अपघातामुळे कुटूंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होत असल्याने अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस / त्यांच्या कुटूंबास आर्थिक लाभ देण्याकरिता कोणतीही स्वतंत्र विमा योजना नसल्याने एक योजना तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

या अनुषंगाने सन २००५-०६ मध्ये शासनाने विविध विमा कंपन्याकडून प्रस्ताव मागविले होते. विमा कंपन्याकडून प्राप्त सर्व प्रस्तावांची सविस्तर छाननी केल्यानंतर आय सी आय सी आय लोंबार्ड जनरल इन्शुरन्स कंपनीचा प्रस्ताव स्वीकारण्यांत आला. कंपनीची शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा पॉलीसी प्रायोगिक तत्वावर तीन महिन्यासाठी घेण्यांस ५ जानेवारी २००५ च्या शासन निर्णयाव्दारे मान्यता दिली होती. व ३१ मार्च २००५ च्या शासन निर्णयाव्दारे पुढील दिनांक १० जानेवारी २००५ ते ९ एप्रिल २००६ या वर्षभराच्या कालावधीसाठी राबविण्यांत आली. सदर योजनेचे कल्याणकारी स्वरुप पहाता ही योजना पुढे सन २००६-०७ मध्ये चालू ठेवण्यांत येत आहे. प्रथम वर्षी २००५-०६ मध्ये योजना नव्याने राबवितांना योजनेचा आराखडा व विमा कंपनीशी

पॉलीसी करारातील पॉलीसी शर्ती व अटी संदर्भात आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इन्शोरन्स कंपनी यांचेशी शासनाची महसूल यंत्रणा, आणि सनियंत्रण करणारे कृषि आयुक्तालय यांचे मतभेद होवून, विमा कंपनीने स्वतःचे मतानुसार विमा प्रकरणावर निर्णय घेतले त्यामुळे वर्षाभरात शेतकऱ्यांच्या अनेक तक्रारी शासनास प्राप्त झालेल्या आहेत. गेल्या वर्षभरात विमा प्रस्ताव सादर करतांना विमा प्रस्तावातील तरतुदी संदर्भातील मतभिन्नतेमुळे ( आयसीआयसीआय विमा कंपनी व शासन यंत्रणेतील) विमा प्रस्ताव कार्यवाहीसाठी प्रलंबीत आहेत. तसेच शेतकऱ्यांना योजनेची पुरेशी माहिती नसल्यामुळे अचानक मृत्यू झाल्यास पोस्टमार्टम न करणे, रासायनिक विश्लेषण न करणे अशा त्रूटी राहून सदर शेतकऱ्याचे कुटुंबीय विमा लाभापासून वंचित रहाण्याची परिस्थिती उद्भवली आहे.

सन २००५-०६ मध्ये शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेचे काम पहाणारे आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इन्सुरन्स कंपनीचे माध्यमातून राबवितांना आलेल्या अडचणींचा विचार करता अपघातग्रस्त शेतकऱ्यांना त्वरित लाभ देण्याच्या संदर्भात विमा विषयाची सखोल माहिती असणाऱ्या विमा सल्लागार यंत्रणेच्या सल्ला सेवेची आवश्यकता योजना राबविणाऱ्या सर्वसंबंधीतांना भासली आहे. त्याप्रमाणे सन २००६-०७ मध्ये शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना आयआरडीए ( I RDA ) कडील परवाना धारक विमा सल्ला सेवा देणाऱ्या संस्था /ब्रोकर कंपनीच्या मदतीने राबविण्यात येत आहे. सदरची विमा सल्लागार यंत्रणा शासनाच्या वतीने सनियंत्रण करणारा कृषि विभाग व विमा कंपनी यांचे मधील दुवा म्हणून काम करेल. त्यामुळे योजनेची अधिक प्रभावीपणे अंमलबजावणी होवून अपघातग्रस्त शेतकऱ्यांची / कुटुंबीयांचे दावे कंपनीशी करण्यात आलेल्या पॉलीशी कराराप्रमाणे अंतिम निर्णय घेऊन वेळेवर समाधानकारकपणे निकालात निघण्यास मदत होईल.

**शासन निर्णय :-**

अ) शासनामार्फत शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना राबविण्यासाठी शासनाचे सल्लागार म्हणून कबाल इन्शुरन्स सर्व्हीसेस प्रा. लि., मुंबई - २१ या इर्डा परवानाधारक ब्रोकर / सल्लागार कंपनीची नेमणूक दिनांक २७ एप्रिल ,२००६ च्या पत्रान्वये करण्यात आलेली आहे. त्यानुसार . दिनांक ६ मे, २००६ रोजी आयुक्त कृषि यांनी कबाल इन्शुरन्स सर्व्हीसेस प्रा. लि. मुंबई -२१ यांचेबरोबर केलेल्या करारनाम्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल. या करारानुसार ही कंपनी शासनास परिशिष्ट-१ मध्ये दर्शविल्याप्रमाणे विनामोबदला सहाय्य करणार आहे.

ब) राज्यातील सर्व शेतकऱ्यांना व्यक्तिगत अपघातापासून संरक्षण देण्यासाठी १) नॅशनल इन्शुरन्स विमा कंपनी व २) रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी या दोन विमा कंपन्यांचा प्रस्ताव स्विकारण्यात येत आहे.

(१) नॅशनल इन्शुरन्स कंपनीचे या प्रयोजनास्तव-- नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर हे महसूल विभाग कार्यक्षेत्र राहील. या क्षेत्रातील ६८ लाख शेतकऱ्यांना विमा संरक्षण देय राहील.

(२) रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनीचे या प्रयोजनास्तव- कोकण व पुणे हे महसूल विभाग कार्यक्षेत्र राहील. या क्षेत्रातील ३८ लाख शेतकऱ्यांना विमा संरक्षण देय राहील.

१) राज्यातील महसूल विभागाकडील नोंदीप्रमाणे १२ ते ७५ वयोगटातील खातेदार (सुमारे १ कोटी ६ लाख) यांचे वतीने शासन त्यांच्या व्यक्तिगत अपघात व अपंगत्व यासाठी विमा पॉलिसी उतरवित आहे. सन २००६-०७ मध्ये शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेसंबंधीत शासनाचे वतीने आयुक्त कृषि यांनी नॅशनल इन्शुरन्स विमा कंपनी व रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी आणि कबाल इन्शुरन्स प्रा.लि.कंपनी ह्या विमा कंपन्यांशी दिनांक १५ जून २००६ रोजी केलेल्या पॉलीशी करारानुसार अंमलात आणली जाईल.. शेतक-याचे / कुटूंबियांचे विमा दावे शासन व विमा कंपनीमध्ये झालेल्या पॉलीशी करारातील तरतुदी, अटी व शर्तीनुसार मंजूर करण्यात येतील.

२) या योजनेअंतर्गत विमा हप्त्याची रक्कम (प्रिमिअम) एकत्रित रक्कम शेतक-यांच्या वतीने संबधित विमा कंपनीस शासन अदा करील. . त्यामुळे उपरोक्त विमा कंपनीस शेतक-यांनी किंवा अन्य कोणत्याही संस्थेने त्यांच्या वतीने या योजनेअंतर्गत स्वतंत्ररित्या विमा हप्त्याची रक्कम भरण्याची गरज नाही.

३) कंपनीच्या प्रस्तावानुसार शेतक-याचा मृत्यु झाल्यावर एक लाख रुपये व अपंगत्व आल्यास प्रकरणपरत्वे रु.५० हजार ते रुपये १.०० लाख ( प्रपत्र 'अ' अनुसार) याप्रमाणे नुकसान भरपाई रक्कम प्राप्त होणार आहे.. याकरीतां प्रति शेतकरी रुपये ६/- प्रमाणे विमा हप्ता एका वर्षासाठी अनुज्ञेय राहणार आहे.. यावर त्यावेळी लागू असणारा सेवा कर जास्तीत जास्त १२.२४ टक्के पर्यंत शासन अदा करेल.

४) ही योजना ज्या दिवशी शासनाकडून धनादेश कंपनीला अदा करण्यात येईल त्या दिवसापासून एक वर्षाच्या कालावधीकरीतां लागू करण्यात येत आहे. या कालावधीकरीतां प्रति शेतकरी ६ रुपये याप्रमाणे विमा हप्ता शासनातर्फे भरण्यास मान्यता देण्यात येत आहे व त्याप्रमाणे विमा हप्त्याची रक्कम ६ कोटी ३६ लाख अधिक लागू असलेल्या सेवाकराच्या टक्केवारीप्रमाणे ७७,८४,६४०/- एवढी विमा हप्त्याची रक्कम अदा करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

५) नॅशनल इन्शुरन्स विमा कंपनी व रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी या विमा कंपन्यांनी इर्डाचे नियमानुसार ब्रोकर/सल्लागार कंपनीस द्यावयाचे कमिशन शासनाच्या संमती शिवाय अदा करु नये. त्यासाठी दर त्रिमाहीस शासनाचे वतीने आयुक्त (कृषि) आढावा घेऊन त्याप्रमाणे तीन महिन्याचे कमिशन कंपनीस अदा करण्यास शासन मान्यता देईल किंवा कबाल इन्शुरन्स प्रा.लि. ही विमा कंपनी शासनास रु. १५ लाखाची बँक गॅरंटी देईल.

६) यापूर्वी शेतक-यांनी अथवा त्यांच्या वतीने अन्य कोणत्याही संस्थेने कोणतीही वेगळी विमा योजना लागू केली असल्यास अथवा विमा उतरविला असल्यास त्याचा या योजनेशी काहीही संबंध राहणार नाही. या योजनेअंतर्गत मिळणारे लाभ स्वतंत्र असतील.

७) या शासन निर्णया सोबत विहित केलेली प्रपत्रे / कागदपत्रे वगळता अन्य कोणतीही कागदपत्रे शेतक-यांनी वेगळ्याने सादर करण्याची आवश्यकता नाही किंवा विमा योजनाअंतर्गत लाभासाठी विमा कंपनीकडे स्वतंत्रपणे

अर्ज / कागदपत्रे सादर करण्याची आवश्यकता नाही. अनावधानामुळे काही कागदपत्र मिळविण्यांचे राहिल्यास व मृत शेतक-यावर अंतिम संस्कार झालेमुळे ती मिळू शकत नसल्यास पर्यायी कागदपत्रे / चौकशीच्या आधारे प्रस्तावाचा निर्णय घेण्यात यावा यासाठी शासन, ब्रोकर कंपनी व विमा कंपनी यांनी संयुक्तपणे निर्णय घ्यावा.

८) योजना कालावधीत संपूर्ण दिवसासाठी म्हणजेच विहित कालावधीतील प्रत्येक दिवसाच्या २४ तासासाठी ही विमा योजना लागू राहील. या कालावधीत शेतक-याला केव्हाही अपघात झाला तरी तो या विमा योजनेअंतर्गत लाभासाठी पात्र राहील.

९) पॉलिसी सुरु झालेल्या कालावधीत शेतक-याचा अपघात झाल्यास सदर विमा योजनेअंतर्गत त्यांच्या कुटुंबास अथवा त्यास द्यावयाची रक्कम, विमा प्रस्ताव विमा कंपनीस ब्रोकर / विमा सल्लागार कंपनी मार्फत विहित केलेल्या सर्व कागदपत्रासह प्राप्त झाल्यापासून एक महिन्याच्या कालावधीत कंपनीने अदा करणे बंधनकारक राहील.

१०) या योजनेअंतर्गत आवश्यक असणारी कागदपत्रे, दर्शविणारी पुढील विवरणपत्रे या शासन निर्णया सोबत जोडलेली आहेत.

**अ) योजनेचे स्वरुप, लाभ व पात्रता दर्शविणारे विवरणपत्रे.**

| | |
|---|---|
| १) विमा योजनेअंतर्गत मिळणारे लाभ | प्रपत्र अ |
| २) लाभार्थी पात्रतेच्या अटी व त्यासाठी आवश्यक कागदपत्रे | प्रपत्र ब |
| ३) विमा संरक्षणामध्ये समाविष्ट नसणा-या बाबी | प्रपत्र क |

**ब) इतर आवश्यक कागदपत्रे व कार्यपध्दती**

| | |
|---|---|
| १) पुराव्यासाठी जोडावयाची कागदपत्रे | प्रपत्र ड व इ |
| २) महसूल यंत्रणेने करावयाची कार्यपध्दती | प्रपत्र ई |
| ३) विमा कंपनीने करावयाची कार्यपध्दती | प्रपत्र फ |
| ४) क्लेम फॉर्म | प्रपत्र ग |

११) या विमा योजनेअंतर्गत नुकसान भरपाईची रक्कम अदा करण्याबाबत विमा कंपनी, लाभार्थी अथवा शासकीय यंत्रणा यामध्ये वाद निर्माण झाल्यास त्याबाबत समाधानकारक तोडगा काढण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे जिल्हा नियंत्रण समिती गठीत करण्यात येत आहे. सदर समिती त्याबाबतचा निर्णय घेईल..

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी /अतिरिक्त जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| निवासी उपजिल्हाधिकारी | सदस्य |
| विमा सल्लागार कंपनी - विभाग प्रमुख | सदस्य सचिव |
| जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| संबंधित विमा कंपनीचे अधिकारी | सदस्य |

वरील समितीची दरमहा सभा होवून त्यामध्ये योजनेतील प्रकरणांचा आढावा घेवून प्रलंबीत / अनिर्णीत / विवादास्पद प्रकरणी अंतिम निर्णय घेवून प्रकरणे नुकसान भरपाई देणेस जलद कार्यवाहीसाठी निर्णय घेईल. व समितीचे निर्णयानुसार अंमलबजावणी करणे संबंधित विमा कंपनीस बंधनकारक राहील.

वरील समितीस जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी हे समन्वय राखण्याच्यादृष्टीने योग्य ते सहकार्य करतील.

१२) संबंधित विमा कंपनीने / विमा सल्लागार कंपनीने व शासन यांनी सदर योजनेस स्थानिक वृत्तपत्रे जाहिरातीव्दारे पुरेशी प्रसिध्दी देऊन ती लोकप्रिय करावी.

१३) सदर योजनेच्या अंमलबजावणीमध्ये अथवा दावे अंतिम करण्यामध्ये काही शंका/ अडचणी असतील तर त्या दूर करणे तसेच योजना , अंमलबजावणी यंत्रणांना व इतर संबंधीतांना समजावून सांगण्यासाठी विमा सल्लागार कंपनी व विमा कंपनीने पुढाकार घेऊन संबंधीत जिल्हाधिकारी यांचे समवेत बैठकांचे आयोजन करावे.

१४) कबाल इन्शुरन्स प्रा. लि. मुंबई - २१ यांनी सदर योजनेचे आयुक्त कृषि यांचे मदतीने पूर्ण सनियंत्रण करावयाचे असून आवश्यकतेप्रमाणे वेळोवेळी बैठका आयोजित करुन, आढावा घेऊन योजनेची परिणामकारक अंमलबजावणी होईल यासाठी कार्यवाही करावी.

१५) सदर योजनेत कोणतेही बदल / सुधारणा इत्यादिचे अधिकार शासनास राहतील. शासन यासाठी विमा कंपनीशी आवश्यकतेप्रमाणे सल्लामसलत करील.

१६)शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेसंदर्भात जनतेकडून लोकप्रतिनिधीकडून विविध प्रकारच्या तक्रारी प्राप्त होत असतात. त्यासंदर्भात शासनास / कृषि आयुक्तालयास कोणत्याही प्रकारची माहितीची आवश्यकता असल्यास सदर माहिती तात्काळ विमा कंपनी, ब्रोकर/सल्लागार कंपनी व जिल्हा नियंत्रण समिती यांनी सादर करणे बंधनकारक राहील.

१७) योजनेची अंमलबजावणी करण्यामध्ये कृषि आयुक्तालय, विमा सल्लागार / ब्रोकर कंपनी , विमा कंपनी, व महसूल यंत्रणेकडून होणार आहे. योजनेच्या सुलभ व परिणामकारक अंमलबजावणीसाठी प्रत्येक यंत्रणेने नेमूण दिलेले काम जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे पार पाडणे बंधनकारक आहे.

**अ) कृषि आयुक्तालय**

शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेच्या संपूर्ण सनियंत्रण हे आयुक्त कृषि यांनी करावयाचे आहे. आयुक्त कृषि यांनी कबाल इन्शुरन्स प्रा. लि. कंपनी व विमा कंपनी कडून योजनेचा मासिक प्रगती अहवाल घेवून योजनेची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्यासाठी सनियंत्रण करावे . योजनेच्या प्रगती बाबत शासनास अवगत करुन विमा दावे प्रकरणी येणाऱ्या तक्रारीवर जिल्हा नियंत्रण समितीची शिफारस घेवून तक्रार निवारण करणे.

ब) ब्रोकर कंपनी

१) शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेमध्ये किंवा नुकसान भरपाईचे दावे हे विमा सल्लागार कंपनी यांचेकडून तपासणी / पडताळणी करुन विमा कंपनीकडे निकाली काढण्यासाठी पाठविण्यात येईल. आयुक्त (कृषि) यांच्याकडे सदर योजनेच्या संनियंत्रणाच्या दृष्टिने विमा सल्लागार विमा कंपनी समवेत वेळोवेळी आढावा घेतील. याबाबत विमा सल्लागार कंपनी त्यांना योजनेतील दावे संदर्भातील मासिक प्रगती अहवाल आयुक्त कृषि यांना सादर करील व या बाबतीत संपूर्ण दाव्यांची माहिती अद्ययावत ठेवणे हे विमा सल्लगार कंपनीची जबाबदारी राहील .

२) सदर योजनेच्या अंमलबजावणीमध्ये अडचण / संदिग्धता निर्माण झाल्यास शासनाच्या वतीने नियुक्त करण्यात आलेल्या विमा सल्लगार कंपनीने ती शासनाच्या वेळीच निदर्शनास आणून/देऊन अडचणीचे वेळीच निराकरण करण्यासाठी शासनाकडे / कृषि आयुक्ताकडे सल्लामसलत करावी.

क) विमा कंपनी

१) शेतकऱ्याचा विमा प्रस्ताव कबाल इन्शुरन्स सर्व्हीसेस प्रा. लि. मुंबई - २१ यांचे मार्फत प्राप्त झाल्यानंतर एक महिन्यात त्यावर निर्णय घेवून नुकसान भरपाई शेतकऱ्यांच्या / वारसदाराच्या बचत खात्यात जमा करेल. शेतकऱ्यांचा विमा प्रस्ताव विहित कागदपत्रासह विमा योजनेच्या कालावधीत केव्हाही प्राप्त झाला तरी तो विचारात घेणे बंधनकारक राहील.( अखेरच्या दिवसात झालेल्या अपघातासाठी योजनेचा कालावधी संपल्यापासून ९० दिवसांपर्यंत विमा प्रस्ताव स्विकारण्यात येतील.)

२) प्रपत्र ड मध्ये नमुद केलेल्या कागदपत्रांच्या आधारेच नुकसान भरपाई अदा करणे. दुर्घटना सिध्द होत असेल व अपवादात्मक परिस्थितीत एखाद्या कागदपत्रांची पूर्तता होवू शकत नसेल तर पर्यायी दाखल्याबाबत शासनाशी विचार विनिमय करुन पूर्तता करुन घेऊन नुकसान भरपाई अदा करावी

३) अपघातग्रस्त वाहनचालकाचे चुकीमुळे शेतकऱ्यांचा मृत्यू झाल्यास / अपंगत्व आल्यास दोषी वाहनचालक वगळता सर्व शेतकऱ्यांना प्रपत्र ड मध्ये नमुद केलेल्या बाबीमुळे मृत्यू / अपंगत्व आल्यास केवळ अपघात झाला या कारणास्तव नुकसान भरपाई दावे मंजूर करण्यात येतील.

४) प्रपत्र फ मध्ये नमुद केलेल्या प्राधान्यक्रमानुसार शेतकऱ्यांचे वारसदार / कुटूंबीयास नुकसान भरपाई अदा करावी.

अपघाती मृत्यू संदर्भात दुर्घटना घडल्याचे सिध्द झाल्यास अनावश्यक बाबी वगळता या कारणास्तव एकही प्रकरण नाकारता येणार नाही.

ड ) महसूल यंत्रणा

१) जिल्हास्तरावरील नियुक्त समितीची मासिक सभा आयोजित करुन योजनेचा आढावा घेवून कृषि आयुक्तालयास अवगत करतील.

१) प्रपत्र ई प्रमाणे विमा प्रस्तावा संदर्भात कार्यवाही करतील.

१८) चालू वित्तीय वर्षासाठी (सन.२००६-०७) अ) नॅशनल इन्शुरन्स कंपनी या विमा कंपनीकडे शेतक-यांना विमा उतरविण्यासाठी विमा हप्ता व त्यावरील सेवाकर यासाठी रुपये ४,५७,११,१२०/- (अक्षरी रुपये चार कोटी सत्तावन्न लाख अकरा हजार एकशे वीस फक्त) इतकी तरतूद याव्दारे मंजूर करुन या आदेशान्वये वितरीत करण्यात येत आहे. ब) रिलायन्स इन्शुरन्स कंपनी या विमा कंपनीकडे शेतक-यांना विमा उतरविण्यासाठी विमा हप्ता व त्यावरील सेवाकर यासाठी रुपये १,५५,१०,७२०/- (अक्षरी रुपये दोन कोटी पंचावन्न लाख नव्वद हजार सातशे वीस फक्त) इतकी तरतूद याव्दारे मंजूर करुन या आदेशान्वये वितरीत करण्यात येत आहे.

१९) यावरील खर्च मागणी क्रमांक ' डी-३, २४०१-पिक संवर्धन, ११०-पिकविमा राज्य योजनेअंतर्गत योजना, (००) (०६) शेतक-यासाठी व्यक्तीगत अपघात विमा योजना (२४०१ ४४१-७) - ४१ अर्थसहाय्य' या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

२०) उपरोक्त प्रयोजनासाठी खर्च करण्यास आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र ,राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम कोषागारातून काढून रेखांकित धनादेशाव्दारे नॅशनल इन्शुरन्स विमा कंपनी व रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी या विमा कंपन्यांना अदा करावी.

२१)' शेतकरी व्यक्तिगत अपघात विमायोजना' ही काही प्रशासकिय अडचणीमुळे दिनांक १० एप्रिल,२००६ नंतर खंडीत झाली आहे. त्यानंतर सदर योजना आतापर्यन्त कार्यान्वित झालेली नाही. त्यामुळे दिनांक १० एप्रिल २००६ ते नव्याने विमा कंपनीची नियुक्ती होईपर्यन्तच्या सेवाखंडातील प्राप्त विमा दावे निकाली काढण्याबाबत स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल. त्यादृष्टीने सर्वंकष योग्य तो प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने सादर करावा.

२१) हे आदेश महसूल व वन विभाग, वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक खर्चनि १००६/प्रक्र.१/अर्थोपाय, दिनांक २० एप्रिल २००६ अन्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या अधीन राहुन सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

( अ. रा. जगताप )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव
२) प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री सचिवालय
३) सचिव, मा.उपमुख्यमंत्री कार्यालय
४) खाजगी सचिव, मा.मंत्री कृषि व जलसंधारण
५) खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री, कृषि

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५/ प्र.क्र.३१० /११ अे, दिनांक७ जुलै २००६ चे सहपत्र.**

**प्रपत्र-अ**

शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना

**व्यक्तिगत अपघात विमा योजनेअंतर्गत मिळणारे लाभ.**

| | अपघाताची बाब | नुकसान भरपाई |
|---|---|---|
| १ | अपघाती मृत्यू | रुपये १,००,०००/- |
| २ | अपघातामुळे २ डोळे निकामी होणे | रुपये १,००,०००/- |
| ३ | अपघातामुळे २ अवयव निकामी होणे | रुपये १,००,०००/- |
| ४ | अपघातामुळे १ डोळा व १ अवयव निकामी होणे | रुपये १,००,०००/- |
| ५ | अपघातामुळे १ डोळा निकामी होणे | रुपये ५०,०००/- |
| ६ | अपघातामुळे १ अवयव निकामी होणे | रुपये ५०,०००/- |

:----------

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस -१२०५ / प्र.क्र.३१० /११ अे, दिनांक - जून, २००६ चे सहपत्र.**

**प्रपत्र-ब**

शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना

**लाभार्थी पात्रतेच्या अटी व त्यासाठी आवश्यक कागदपत्रे**

१ महाराष्ट्र राज्यातील १२ ते ७५ वयोगटातील महसूल नोंदी नुसार असलेला खातेदार शेतकरी.

२ शेतकरी म्हणून त्याचे नावाचा समावेश असलेला ७/१२ किंवा ८-अ नमुन्यातील उतारा

३ शेतकऱ्यांचे वारस म्हणून गावकामगार तलाठयाकडील गांव नमुना नं. ६ क नुसार मंजूर झालेली वारसाची नोंद

४ शेतकऱ्यांच्या वयाच्या पडताळणीकरिता शाळा सोडल्याचा दाखला/ रेशनकार्ड /निवडणूक कार्ड / शाळेच्या मुख्याध्यापकाचे प्रमाणपत्र / ग्रामपंचायतीचे प्रमाणपत्र या पैकी कोणतेही एक प्रमाणपत्र

-------

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५ / प्र.क्र.३१० /११ अे, दिनांक ७ जुलै, २००६ चे सहपत्र.**

**प्रपत्र-क**

शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना

**विमा संरक्षणामध्ये समाविष्ठ नसणाऱ्या बाबी**

१ विमा कालावधी पूर्वीचे अपंगत्व

२ आत्महत्येचा प्रयत्न, आत्महत्या किंवा जाणीवपूर्वक स्वतःला जखमी करुन घेणे.

३ गुन्हयाच्या उद्देशाने कायद्याचे उल्लंघन करतांना झालेला अपघात.

४ अंमली पदार्थाच्या अमलाखाली असतांना झालेला अपघात

५ नैसर्गिक मृत्यू

६ भ्रमिष्टपणा.

७ बाळंतपणातील मृत्यू

८ शरीरांतर्गत रक्तस्त्राव

९ मोटार शर्यतीतील अपघात

१० युध्द

११ सैन्यातील नोकरी

१२ जवळच्या लाभ धारकाकडून झालेला खून

------

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५/ प्र.क्र.-३१० /११ अे, दिनांक -७जुलै, २००६ चे सहपत्र.**

**प्रपत्र-ड**

**शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना**

**अपघाताचे पुराव्यासाठी सादर करावयाची कागदपत्रे**

| अ.क्र. | अपघाताचे स्वरुप | आवश्यक कागदपत्रे |
|---|---|---|
| १ | रस्त्यावरील अपघात | प्रथम माहिती अहवाल,स्थळ पंचनामा,चौकशी अहवाल,मृत्यू विश्लेशण अहवाल,मृत्यू दाखला |
| २ | रल्वेअपघात | प्रथम माहिती अहवाल,चौकशी अहवाल,मृत्यू विश्लेषण अहवाल,मृत्यू दाखला |
| ३ | पाण्यामध्ये बूडून मृत्यू | प्रथम माहिती अहवाल किंवा पोलीस पाटील अहवाल,मृत्यू विश्लेशण अहवाल,मृत्यू दाखला,(बुडून बेपत्ता झाल्यास मृत्यू दाखला, मृत्यू विश्लषण अहवाल;ची सूट,तथापि क्षतिपूर्ती बंधपत्र आवश्यक) |
| ४ | जंतुनाशक अथवा अन्य कारणामुळे विषबाधा | प्रथम माहिती अहवाल किंवा पोलिसपाटील अहवाल,मृत्यू विश्लेषण अहवाल/ रासायनिक विश्लेषण अहवाल,मृत्यू दाखला |
| ५ | विजेचा धक्का अपघात | प्रथम माहिती अहवाल किंवा पोलीस पाटील अहवाल चौकशी अहवाल,मृत्यू विश्लेषण अहवाल म.रा.वि.कं.चा पंचनामा,मृत्यू दाखला |
| ६ | विज पडून मृत्यू | प्रथम माहिती अहवाल किंवा पोलीस पाटील चौकशी अहवाल,मृत्यू विश्लेषण अहवाल,मृत्यू दाखला |
| ७ | खून | प्रथम माहिती अहवाल,चौकशी अहवाल, मृत्यू विश्लेषण अहवाल,मृत्यू दाखला. |
| ८ | उंचावरुन पडून झालेलाअपधात वा मृत्यू | प्रथम माहिती अहवाल,किंवा पोलिस पाटील चौकशी अहवाल, मृत्यूविश्लेषण अहवाल, पोलिस अंतिमअहवाल मृत्यू दाखला |
| ९ | सर्पदंश / विंचू दंश | पोलीस पाटील अहवाल,मृत्यू विश्लेषण अहवाल डॉक्टरांचे मतानुसार आवश्यक असल्यास रासायनिक विश्लेषण अहवाल (वैद्यकिय उपचारापूर्वी निधन झाल्याने मृत्यू विश्लेषण झाले नसल्यास चौकशी अहवाल, स्थळ पंचनामा पोलीस पाटील अहवाल)मृत्यू दाखला |
| १० | नक्षलाईटकडून झालेल्या हत्येसंदर्भात | प्रथम माहिती अहवाल किंवा पोलीस पाटील अहवाल,मृत्यू विश्लेषण अहवाल नक्षलाईट हत्येसंदर्भातील कार्यालयीन कागदपत्रे,मृत्यू दाखला. |
| ११ | जनावरांच्या चावण्यामुळे<br>अ)रेबीज होवून मृत्यू<br>ब)जखमी होऊन अपंगत्व<br>क)जनावराच्या हल्ल्यात मृत्यू होवून शव न मिळणे | औषधोपचाराची कागदपत्रे,स्थळ पंचनामा,चौकशी अहवाल,डॉक्टरांचे मतानुसारआवश्यक असल्यास मृत्यु विश्लेषण अहवाल,मृत्यु दाखला<br>स्थळ पंचनामा,चौकशी अहवाल/मृत्यु विश्लेषण अहवाल,मृत्यु दाखला.<br>स्थळ पंचनामा,चौकशी अहवाल,पोलिस पाटील अहवाल,क्षतीपूर्ती बंधपत्र |
| १२ | दंगल | प्रथम माहिती अहवाल किंवा पोलिस पाटील अहवाल,मृत्यू विश्लेषण अहवाल,दंगली बाबतची कार्यालयीन कागदपत्रे,मृत्यू दाखला |
| १३ | अन्य कोणतेही अपघात | प्रथम माहिती अहवाल,पोलीस पाटील अहवाल मृत्यू दाखला |

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५ / प्र.क्र.३१०/११ अे, दिनांक -७जुलै, २००६ चे सहपत्र.**

**प्रपत्र-इ**

शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना

**अपंगत्व लाभाच्या पुराव्यासाठी सादर करावयाची कागदपत्रे -**

१ अपंगत्व अथवा अवयव निकामी होण्याचे कारणाबाबतचे डॉक्टरांचे अंतिम प्रमाणपत्र अथवा दवाखान्याच्या नोंदी व प्रमाणपत्र.

२ प्राथमिक आरोग्य केंद्र / उप केंद्राचे प्रमाणपत्र , जिल्हा शल्य चिकित्सकाच्या प्रतिस्वाक्षरीसह

------

**निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस -१२०५- / प्र.क्र.३१० /११ अे, दिनांक - ८जुलै, २००६ चे सहपत्र.**

-----

**प्रपत्र-ई**

शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना

**महसूल यंत्रणेने करावयाची कार्यपध्दती**

१ शेतकऱ्यांने / शेतक-यांचे वारसदाराने दुर्घटना घडल्यानंतर तातडीने संबंधित तलाठी यांचेकडे विहीत कागदपत्रांसह विमा प्रस्ताव सादर करावयाचा आहे.

२ शेतकऱ्याकडून विमा प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर पुढील एक आठवडयामध्ये सदर तलाठी शेतकऱ्याने दावा प्रस्तावात आवश्यक असलेल्या कागदपत्रांची पूर्तता केलेली नसल्यास स्वतः शासन निर्णयासोबत विहित केलेल्या सर्व कागदपत्रांची आवश्यकतेनुसार पूर्तता करुन पुन्हा ७-१२, ८ अ, नुसार तो खातेदार असल्याच्या प्रमाणपत्रासह विमा दाव्याचा प्रस्ताव संबंधित तहसिलदारास सादर करील.

३ प्राप्त प्रस्तावाची तपासणी करुन सदर प्रस्ताव तहसलिदार त्याच्या प्रमाणपत्रासह -कबाल इन्शुरन्स प्रा.लि. या ब्रोकर कंपनीच्या संबंधीत विभागीय कार्यालयाकडे (परिशिष्ट-२ प्रमाणे ) एक आठवडयांत पाठवतील व त्याची एक प्रत जिल्हाधिकाऱ्यांना सादर करतील.

४· संबंधीत शेतकऱ्यांचे अथवा कुटूंबियाचे बॅंकेत खाते नसल्यास, नवीन खाते शक्यतो जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅंकेच्या नजिकच्या शाखेत उघडून त्याचा तपशिल, **विमा कंपनीस कळविण्याची जबाबदारी संबंधीत तहसिलदाराची राहील.**

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५ / प्र.क्र.३१० /११ अे, दिनांक- ७जुलै, २००६ चे सहपत्र.**

**प्रपत्र-फ**

शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना

**विमा कंपनीने करावयाची कार्यपध्दती**

१ तहसिलदाराकडून , ब्रोकर कंपनीच्या विभागीय कार्यालयामार्फत प्रस्तावाची तपासणी / पुर्तता करुन १५ दिवसांचे आंत प्रस्ताव संबधित विमा कंपनीकडे सादर करावेत.कोणत्याही परिस्थितीत विहित मुदतीत विमा कंपनीकडे प्रस्ताव सादर करण्याबाबत योग्य ती दक्षता घेण्यात यावी..

२. ब्रोकर कंपनीकडून प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर विमा कंपनीने एक महिन्यामध्ये (३० दिवस) नुकसान भरपाई रक्कमेचा धनादेश संबंधीत शेतकरी / त्यांचे कुटूंबियांच्या, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक अथवा राष्ट्रीय कृत बँकेच्या शाखा व्यवस्थापकाकडे जमा करावा. त्यानंतर सबंधीत शाखा व्यवस्थापकांनी शेतकऱ्यांच्या / त्यांच्या कुटूंबियाच्या खात्यामध्ये तात्काळ ही रक्कम जमा करावी.

३ विम्याच्या दाव्याची रक्कम विमा कंपनीने कोणत्याही शासकिय यंत्रणेकडे न देता सरळ विमा धारकाच्या बँक खात्यामध्ये जमा करावी.

४ संबंधीत शेतकऱ्यांचे अपघातामध्ये निधन झालेले असल्यास त्यांच्या कुटूंबियास दाव्याची रक्कम पुढील प्राधान्यानुसार अदा करावी.

अ) मृत शेतकऱ्यांची पत्नी

ब) मृत शेतकऱ्यांची अविवाहित मुलगी

क) मृत शेतकऱ्यांची आई

ड)मृत शेतकऱ्यांचे मुलगे

ई ) मृत शेतकऱ्यांची नातवंडे

फ) मृत शेतकऱ्यांची विवाहित मुलगी

------

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५ / प्र.क्र.३१० /११ अे, दिनांक ५० जुलै, २००६ चे सहपत्र.**

**सहपत्र प्रपत्र-ग**

## शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना

### क्लेम फॉर्म भाग-१

१) मी / आम्ही खाली सही करणार श्री. / श्रीमती ____________________ मौजे तालूका________ जिल्हा________ येथील रहिवासी घोषित करतो की, श्री. / श्रीमती________________ __मौजे ______ता.______ जि.________ यांचे दिनांक______ रोजी अपघातामुळे निधन झालेले आहे / त्यांना कायम स्वरुपी अपंगत्व आलेले आहे.ते शेतकरी असून व्यक्तिगत अपघात विमा योजने अंतर्गत नुकसान भरपाई मिळण्यांस पात्र आहेत.

२) मी/ आम्ही श्री./ श्रीमती ________________ यांचे नामनिर्देशित म्हणून रु. १,००,०००/- , ५०,०००/- एवढया शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेखालील विमा रक्कमेच्या दाव्यासाठी अर्ज करीत आहे / आहोत. आपणास विनंती करण्यांत येते की, कृपया सदर दावा निकाली काढून दाव्याची रक्कम खाली नमुद केलेल्या पत्त्यावर अदा करावी. सोबत ७/१२ व वयाचा दाखला

स्थळ -

दिनांक - अर्जदार

१) नांव

२) पत्ता

३) वय

४) लिंग ( पुरुष / स्त्री )

५) अपघाताची तारीख

६ ) अपघाताचा प्रकार :-

७ ) अपघातग्रस्ताने धारण केलेली एकूण जमीन

८ ) बॅंकेचा तपशिल

अ) रक्कमा ज्याचे नावे काढावयाची त्याचे संपूर्ण नाव

ब) बॅंकेचे नांव

क ) शाखा व पत्ता

ड ) बचत खाते क्रमांक

भाग-२

शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजना

**तलाठयाचे प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यांत येते की श्री. / श्रीमती ____________________ मौजे ________________ तालूका______ जिल्हा ________ हे / ह्या शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजने अंतर्गत समाविष्ट असून अपघातामुळे ते / त्याचे वारस रु. १,००,०००/- / ५०,०००/- एवढया रक्कमेच्या दाव्यास पात्र आहेत.

श्री./ श्रीमती ______________ यांचे नांवे वहिताखालील एकूण ________________ एवढी एकर जमीन असून ते ____________________ या गावाचे खातेदार आहेत. त्यांचा ७/१२ व ६ क चा खातेउतारा सोबत जोडलेला आहे. त्यांचे कायदेशीर वारस पुढील प्रमाणे आहेत

१ नांव नांते

२

३

स्थळ -

दिनांक - ( )

तलाठी

--------

भाग-३

**तहसिलदाराचे प्रमाणपत्र**

प्रमाणित करण्यांत येते की, श्री. / श्रीमती __________________________ मौजे ________ तालूका_______ जिल्हा_________ हे / ह्या शेतकरी व्यक्तीगत अपघात विमा योजने अंतर्गत समाविष्ट असून अपघातामुळे प्रपत्र फ तील प्राधान्यक्रमानुसार श्री / श्रीमती ____________________ ________ हे त्यांचे वारस रु. १,००,०००/- / ५०,०००/- एवढया रक्कमेच्या दाव्यास पात्र आहेत.

स्थळ - ( )

दिनांक - तहसिलदार

भाग-४

क्रमांक :

दिनांक :

प्रति

कबाल इन्सूरन्स सर्व्हिसेस प्रा. लि.

विभागीय कार्यालय -------------

**विषय :- शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजनेअंतर्गत नुकसान भरपाई मिळण्याबाबत**

महोदय

श्री. / श्रीमती ____________________ मौजे ________ तालूका ______ जिल्हा ________ यांना दिनांक __________ रोजी अपघात झालेला आहे. त्यांनी त्यांच्या पात्र लाभार्थ्यांनी या योजनेंतर्गत नुकसान भरपाईसाठी अर्ज केलेला आहे. याबाबतचा तपशील पुढील प्रमाणे आहे.

अपघात /मृत्यूचा दिनांक

मृत्यू असल्यास कारण

लाभार्थीचे नांव

( )

तहसिलदार-----------------

जिल्हा ---------------------

सोबत

१) मुळ दावा अर्ज

२) तलाठयाचे प्रमाणपत्र

३) ७/१२ / ८ अ व ६ क चा उतारा

४) तहसिलदाराचे प्रतिस्वाक्षरीत प्रमाणपत्र

५) अपघाताच्या अनुषंगाने इतर आवश्यक कागदपत्रे/ प्रमाणपत्रे.

-------

एच–831 –8अ

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५ / प्र.क्र.३१० /११ अ, दिनांक जुलै, २००६ चे सहपत्र.**

**परिशिष्ट - १**

**कबाल इन्शुरन्स प्रा.लि.मुंबई यांच्याबरोबर केलेल्या करारनाम्याप्रमाणे करण्यात येणारी कार्यवाही.**

१) ब्रोकर कंपनी तपशिलवार विमा पॉलीशी तयार करण्यास शासनास मदत करुन आवश्यकते प्रमाणे पॉलीशीमध्ये संदीग्धता रहाणार नाही याची काळजी घेईल पर्यायाने विमा प्रस्ताव फेटाळले जाण्याचे प्रमाण कमी राहील.

२) विमा पॉलीशीसाठी निविदा / दरपत्रके मागविण्यापूर्वी इन्शुरन्स कंपन्याना आमंत्रित करुन विमा पॉलीशीचे आकलन करुन देण्यांत येईल. यामुळे विमा पॉलीशी संदर्भातील गैरसमज राहणार नाहीत.

३) विमा कंपन्याकडून निविदा / दरपत्रके मागविली जातील

४) विमा कंपन्याकडून प्राप्त निविदा / दरपत्रकांचे विश्लेषण करुन विमा कंपनीने सादर केलेल्या अटींचा विचार करुन नियमाप्रमाणे आयुक्त यांचे संमतीने निविदा / दरपत्रके स्विकारली जाईल. ब्रोकर कंपनी , शासन व विमा कंपनी मध्ये पॉलीसी करार करण्यांसाठी आयुक्तालयास तांत्रिक मदत करील

५) विमा कंपनी विमा योजनेची अंमलबजावणी पॉलीशी कराराप्रमाणे करीत असल्याची खातरजमा करुन गरज भासल्यास विमा कंपनीस योग्य ते संगणक आज्ञावली तयार करण्यांस मदत करील.

६) विमा योजनेची प्रसिध्दी करण्यांस मदत करील

७) विमा कंपनीच्या सयुक्त विद्यमाने विमा दावे निकाली काढण्यासंदर्भात पुढील प्रमाणे काम करील

अ) विमा दावे विमा कंपनीस पाठविण्यापूर्वी तपासणीसाठी स्विकारणे. त्यासाठी महसूल विभागस्तरावर / जिल्हास्तरावर कार्यालय सुरु करतील.

ब) विमा प्रस्तावातील कागदपत्रांची पूर्तता झाली असल्याची खातरजमा करतील.

क) विमा प्रस्तावातील कागदपत्रांची पूर्तता करुन घेवून ती पूर्णपणे असल्याची खात्री झाल्यानंतर विहित मुदतीत विमा कंपनीस प्रस्ताव पाठविणे व तो प्रस्ताव मंजूर होईपर्यंत त्याचा पाठपूरावा करणेची कार्यवाही करील.

८) योजनेच्या प्रगतीचे मासिक , त्रैमासिक आढावा घेवून योजनेत कांही उणीवा आढळल्यास दुर करणे

९) विमा कंपनीच्या व शासनाच्या मध्ये समन्वय साधून चर्चेव्दारे वाद विवाद प्रकरणी वेळोवेळी निराकरण करणे व संबंधीतांना नुकसान भरपाई देणेसाठी काम करणे.

१०) २००५-०६ मधील यापूर्वीचे तसेच सदर शासन निर्णयान्वये उद्‌भवणा-या वादग्रस्त प्रकरणाबाबत शेतक-यांना देय लाभ मिळवून देणे संदर्भात शासनास सल्ला देणे व शासनाचे वतीने कायदेशीर कार्यवाही करणे.

**शासन निर्णय कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, पीआयएस १२०५ / प्र.क्र.३१०/११ अे, दिनांक -७ जुले, २००६ चे सहपत्र.**

**परिशिष्ट - २**

१ विमा कंपनी कार्यक्षेत्र

**अ) नॅशनल इन्शुरन्स कंपनी लि.**

नाशिक , औरंगाबाद, अमरावती व नागपूर हे महसूल विभाग

**ब) रिलायन्स जनरल इन्शुरन्स कंपनी लि.**

कोकण व पुणे हे महसूल विभाग

२) कवाल इन्शुरन्स सर्व्हिसेस प्रा. लि ब्रोकर / सल्लागार कंपनीची विभागीय कार्यालये

१ **मुंबई**

श्रीमती मिताली बोरकर — फोन - ०२२ - ५६३२४९१८ / १९
११८ बी, मित्तल टॉवर , नरीमन पॉईंट — फॅक्स ०२२ - ५६३२४९२०
मुंबई - ४०० ०२१

२ **नाशिक**

श्री. जी. गाडेकर — फोन - ०२५३ -२५७८०००
बी- १६ सोनाक्षी — फॅक्स
अमृत धामच्या समोर
न्यू शांतीनिकेतन कॅम्पस,
आग्रा रोड, पंचवटी, नाशिक -४२२ ००३

३ **पुणे**

श्रीमती सुचेता प्रधान — फोन - ०२० - २५५२१४१२
१०१ शिवाजीनगर ३ रा मजला — फॅक्स - ०२०- २५५२१४१३
पुणे - ४११ ००५

४ **औरंगाबाद**

विनित आठल्ये
भास्करायण एचडीएफसी होम लोन बिल्डींग — फोन ०२४० - ५६१३५७७
प्लॉट नं. [illegible] सेक्टर ई-१ टाऊन सेंटर — फॅक्स
सिडको, औरंगाबाद - ४३१ ००३

५ **अमरावती**

श्री. सर्वेश अग्रवाल — फोन ०७१२ - २५७९७६३
कॉलेज रोड, चौधरी चौक — फॅक्स०७२१ - २५७९७६३
जून्या कॉटन मार्केट मागे
अमरावती - ४४४ ६०१

६ **नागपूर**

श्री. के. व्ही. आर. चारी — फोन -०७१२ - २२४ ७७२८
३३ विजया आर्केड — फॅक्स - ०७१२ - २२४ ७७२८
३ रा मजला, शंकरनगर जवळ
नॉर्थ अंबाझरी रोड, शिवाजीनगर
नागपूर - ४४० ०१०

-----